**अमरावती शहर एकात्मिक रस्ते विकास योजना अंतर्गत सुरु न झालेल्या आठ पथकर स्थानकापोटी उद्योजकास द्यावयाच्या नुकसान भरपाईबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खाक्षेस-२००४ / प्र.क्र. ८६ / रस्ते-८.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०१ ऑक्टोबर, २०१८

**वाचा**

१) शासन निर्णय, क्र. पासूस- २००१/ प्र.क्र. ७१/का.१४७४, दि.१४.०२.२००२.
२) शासन निर्णय, क्र. खाक्षेस- २००४/ प्र.क्र. ८६/रस्तक-८, दि.१९.०१.२०१०.

**प्रस्तावना :-**

नियोजन विभागाच्या दि.१४.०२.२००२ रोजीच्या शासन निर्णयानुसार नंदुरबार शहरातील वाहतूक व्यवस्थेत सुधारणा करण्यासाठी अंदाजित किंमत रु. ११४.४७ कोटी खर्चाची रस्ते व पुलांची कामे “बांधा व हस्तांतरीत करा” या तत्वावर कार्यान्वित करण्यासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास “उद्योजक” म्हणून घोषित करण्यात आले आहे. तद्नंतर सार्वजनिक बांधकाम विभागाने दि.१९.०१.२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये अमरावती शहर एकात्मिक रस्ते विकास योजनेअंतर्गत दि.२०.०१.२०१० ते ३१.०३.२०२२ या कालावधीसाठी पथकर नाक्यावर पथकराची रक्कम वसुल करण्याचा हक्क महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ (मर्या), मुंबई यांना प्रदान केला आहे. काही अपरिहार्य कारणास्तव पथकर वसुली सुरु करण्यात आलेली नाही. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने सदर प्रकल्प कर्ज रोख्याच्या माध्यमातून निधी उभारुन पूर्ण केला असून, त्याकरीता रु.१५६.३४ कोटी इतका खर्च झालेला आहे. सदर योजनेअंतर्गत महामंडळास झालेल्या खर्चास व त्यातील सुधारीत वावास तसेच महामंडळाने केलेल्या खर्चावर व्याजासह रक्कम देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याअनुषंगाने मंत्रीमंडळ पायाभूत सुविधा समितीच्या दिनांक २३.०८.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत सदर बाबीस मान्यता देण्यात आलेली आहे. यानुसार आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

अमरावती शहर एकात्मिक रस्ते विकास योजनेची मुळ मंजुर रक्कम रु.११४.४७ कोटी इतकी असून, सदर योजनेची सुधारीत रक्कम रु.१५६.३४ कोटी इतकी येत आहे. या अनुषंगाने सदर प्रकल्पास शासनाची खालीलप्रमाणे मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. अमरावती शहर एकात्मिक रस्ते विकास योजनेच्या रु.१५६.३४ कोटीच्या सुधारीत अंदाजित किंमतीस तसेच त्यात समाविष्ट कामांच्या सुधारीत वावास मान्यता देण्यात येत आहे.

२. अमरावती शहर एकात्मिक रस्ते विकास योजना या प्रकल्पावर महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने केलेल्या कामापोटी १४% व्याजदराने दि.३१.१०.२०१६ अखेरपर्यंत येणारी रु.१६८.४१ कोटी एवढी रक्कम एकरकमी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास अर्थसंकल्पिय तरतुदीमधून उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे. या थकीत रकमेवर देय दिनांकापर्यंत रोकड प्रवाहानुसार परिगणित करुन १४% दराने व्याजासहीत येणारी एकूण देय रक्कम वित्त विभागाकडून अंतिमत: प्रमाणित करुन महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास एकरकमी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १०२/१४६१, दि. २८.०५.२०१८ तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ६१/व्यय-११, दि. ०८.०३.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीसअनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००११७४१४३००१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Avinash Trimbakrao Dhondge

Digitally signed by Avinash Trimbakrao Dhondge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c027c83219049ab50c11c48a886d96688cd20f344566980536900a21e1d9a74b, serialNumber=4be0cd9a533d89e3ab5f3d01c44606657e57bbf30754f79095f947378c30d155, cn=Avinash Trimbakrao Dhondge
Date: 2018.10.01 17:44:21 +05'30'

**( अविनाश त्रिं.धोंडगे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत –**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई
५) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम, मंत्रालय, मुंबई
६) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
७) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
८) सर्व विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य.
९) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई

११) अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई
१२) प्रधान सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव (विधि व न्याय विभाग), मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव (नगर विकास विभाग), मंत्रालय, मुंबई
१५) सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, म.रा.र.वि. महामंडळ, वांद्रे, मुंबई-५०
१७) सर्व मंत्रालयीन विभाग
१८) निवड नस्ती (रस्ते-८), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय